कल्याण लोहमार्ग पोलीस ठाणे गु.नों.क्र.१६४/२००८ मधून उद्‌भवणा-या न्यायालयीन प्रकरणी शासनातर्फे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्रीमती रोहिणी सॅलियन यांना व्यावसायिक फी मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र. एसपीपी २००८/प्र.क्र.३०६/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक : ३ ऑगस्ट , २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी-२००८/ए.एस.१०२/डी-चौदा, दिनांक २४.१०.२००८.

**शासन निर्णय** :- दिनांक १९.१०.२००८ रोजी रेल्वे भरती बोर्डाच्या परिक्षेच्या दिवशी महाराष्ट्र नवनिर्माण सेनेच्या कार्यकर्त्यांनी परप्रांतीय उमेदवारांविरुध्द केलेल्या आंदोलनाच्या संदर्भात दाखल कल्याण लोहमार्ग पोलीस ठाणे गु.नों.क्र.१६४/२००८ मधून उद्‌भवलेल्या आणि प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी, कल्याण न्यायालय, सत्र न्यायालय तसेच उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने काम पाहण्यासाठी ॲड.श्रीमती रोहिणी सॅलियन यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २४.१०.२००८ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्रीमती रोहिणी सॅलियन यांना प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी रु. १०,०००/- प्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत न्यायालयाच्या अभिलेख्यांवरुन संबंधीत प्रकरणाच्या पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा पर्यवेक्षीय अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४.        यासाठी येणारा खर्च मागणी क्र.मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५.        हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर- ४४७/११/ व्यय-७, दिनांक २८.७.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.        सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८०३१६४४०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. वि. दपके)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

- पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई .
- पोलीस आयुक्त, लोहमार्ग, मुंबई .
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
- विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
- ॲड. श्रीमती रोहिणी सॅलियन, सिटी सिव्हील आणि सेशन कोर्ट लायब्ररी, मुंबई, जुने सचिवालय, फोर्ट, मुंबई.
- निवड नस्ती (पोल-१०).